# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्पीय) अधिवेशन, २०२३

---

**अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी**

**प्रश्नांची एकूण संख्या - १९**

---

### चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पांतर्गत भूमिगत विद्युत प्रणाली प्रकल्पाद्वारे समुद्र किनारी असलेल्या सर्व गावांमधील विद्युत वाहिन्या भूमिगत करण्याबाबत

**(१) ९५९४ (१०-०६-२०२१) श्री.प्रसाद लाड, श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **उप मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) दिनांक ३ जून, २०२० रोजी झालेल्या निसर्ग चक्रीवादळामध्ये रायगड जिल्ह्यातील अलिबाग, कर्जत, उरण, खालापूर, पेण, रोहा, मुरूड, महाड, पोलादपूर आदी भागात वीज यंत्रणा कोलमडून १० लाख ग्राहकांचा वीज पुरवठा खंडित होऊन वीज पुरवठा सुरळीत होण्यासाठी बराच कालावधी लागला होता, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कोकणामध्ये निसर्ग व तौक्ते चक्रीवादळामुळे वीज वाहिन्या तुटणे, खांब पडणे यामुळे महावितरणाचे मोठ्या प्रमाणावर नुकसान झाले असून बहुतांश गावात अनेक दिवस वीज पुरवठा खंडीत झाला होता, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, भविष्यात चक्रीवादळामध्ये सागरी किनारी क्षेत्रातील ओव्हर हेड, वीज वाहिन्या भूमिगत करण्याचा पेण महामंडळाने तयार केलेला ८३३ कोटीचा प्रस्ताव महावितरणच्या मुख्य कार्यालयास सादर करण्यात आला असून सदरहू प्रस्तावास ६ महिने झाले असून शासनाची मंजूरी मिळालेली नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने महावितरणाने सादर केलेल्या सागरी किनारी क्षेत्रातील ओव्हर हेड, विद्युत वाहिन्या भूमिगत करण्याच्या प्रस्तावास विनाविलंब मंजूरी देऊन राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पांतर्गत संपूर्ण गावांमधील विद्युत वाहिन्या भूमिगत करण्यासाठी कोणती कार्यवाही/ उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-१२-२०२२) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२) हे अंशत: खरे आहे.

(३) भविष्यात चक्रीवादळामध्ये सागरी किनारी क्षेत्रातील ओव्हर हेड, वीज वाहिन्या भुमिगत करण्यासाठी राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पामध्ये पेण मंडळांतर्गत सागरी किनार पट्टीलगतच्या उर्वरित गावांचा समावेश करण्यासाठी रक्कम रुपये ८३३.७३ कोटी निधीचा प्रस्ताव शासनाकडे दिनांक ०३/०९/२०२० रोजी सादर करण्यात आला आहे.

शासन निर्णय दिनांक १० नोव्हेंबर, २०२१ नुसार कोकण किनारपट्टीवरील जिल्ह्यात चक्रीवादळासारख्या नैसर्गिक आपत्तीमुळे होणारे नुकसान विचारात घेऊन ‘‘कोकण आपत्ती सौम्यीकरण प्रकल्प’’राबविण्यास मंत्री मंडळाने तत्वत: मान्यता दिलेली असून या प्रकल्पात भूमिगत विद्युत वाहिनीचे काम अंतर्भूत करण्यात आले आहे.

(४) सदर प्रकल्पामध्ये सागरी किनार पट्टीलगतच्या पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग जिल्ह्यातील गावांचा समावेश करण्यासाठी रुपये २७८४.२७ कोटींचा अतिरिक्त निधीचा प्रस्ताव शासनाकडे दिनांक ०३/०९/२०२० रोजी सादर करण्यात आला आहे. शासनाच्या मंजुरीनंतर व निधीच्या उपलब्धतेनुसार उपरोक्त कामे करण्यात येतील. राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण (NCRMP) अंतर्गत अलिबाग शहरामध्ये रुपये ८९.५३ कोटी इतक्या रकमेची कामे प्रगतीपथावर आहेत.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## औरंगाबाद महानगरपालिकेत शिक्षण विभागाने नियमबाहयरित्या शिक्षकांची नियुक्ती केल्याबाबत

**(२) १०६१८ (०५-०१-२०२२) श्री.अंबादास दानवे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद महानगरपालिकेतील शिक्षण विभागाने न झालेल्या सर्वसाधारण सभेचा उल्लेख करुन एकूण दहा शिक्षकांची तासिका तत्वावर नेमणूक केल्याची बाब नुकतीच माहे ऑक्टोबर, २०२१ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त नियमबाहय शिक्षक नियुक्तीप्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार जबाबदार असणाऱ्यांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे तसेच नियमबाहय शिक्षक नियुक्ती तातडीने रद्द करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१०-०२-२०२३) :** (१) हे खरे नाही.

औरंगाबाद महानगरपालिकेच्या दिनांक ०६/०२/२०१९ रोजी झालेल्या सभेमध्ये माध्यमिक शाळा सिल्कमिल कॉलनी व माध्यमिक शाळा अशोकनगर या दोन्ही शाळेसाठी ६ व माध्यमिक शाळा यशोधरा कॉलनीसाठी २ तसेच माध्यमिक शाळा बेगमपुरा शाळेसाठी १ असे एकूण ९ शिक्षकांची निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात आली.

सदरची नियुक्ती आदेश देतांना अनावधानाने दिनांक ०६/०२/२०१९ रोजी झालेल्या सभेऐवजी दिनांक ०९/०२/२०१९ नमूद झालेले आहे.

(२) सदरील नियुक्त्या ह्या तात्पुरत्या स्वरुपातील असून शैक्षणिक वर्ष संपताच नियुक्ती संपुष्टात आली आहे. सद्य:स्थितीत संबंधित ९ माध्यमिक शिक्षक सेवेत कार्यरत नाहीत.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## घोलाईनगर (जि.ठाणे) येथे दरड कोसळल्याने पाच जणांचा मृत्यू झाल्याबाबत

**(३) ११६६६ (०५-०१-२०२२) ॲड.निरंजन डावखरे, श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **उप मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) घोलाईनगर (जि.ठाणे) येथे दरड कोसळल्याने पाच जणांचा मृत्यू झाला असून याप्रकरणी दोषी अधिकाऱ्यांवर मोक्का अंतर्गत कारवाई करण्याची मागणी विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद यांनी माहे सप्टेंबर, २०२१ मध्ये वा त्यादरम्यान केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी संबंधित अधिकाऱ्यांवर कारवाई करण्यात आली आहे काय, कारवाईचे स्वरूप काय आहे,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१७-०१-२०२३) :** (१), (२) व (३) घोलाईनगर येथे दिनांक ११/७/२०२१ रोजी झालेल्या अतिवृष्टीमुळे पाण्याच्या प्रवाहाने डोंगरावरील दरड घरावर कोसळून घर गाडले गेल्याने ५ जणांचा अकस्मात मृत्यू झाला आहे. त्याबाबत कळवा पोलीस स्टेशन येथे सी.आर.पी.सी. कलम १७४ अन्वये अकस्मात मृत्यू रजि.नं. १०८/२०२१ दाखल केलेला असून चौकशीअंती "अपघाती मृत्यू" समरी करिता अहवाल पाठविण्यात आला आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुण्यातील बजाज फायनान्स कंपनीचे अधिकारी संजीव बजाज यांना कंपनीचा डाटा हॅक करण्याची धमकी देऊन खंडणी मागितल्याबाबत

**(४) १२०३० (३०-०३-२०२२) श्री.महादेव जानकर :** सन्माननीय **उप मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुण्यातील बजाज फायनान्स कंपनीचे अधिकारी संजीव बजाज यांना कंपनीचा डाटा हॅक करण्याची धमकी देऊन रुपये ११ कोटी ६३ लाख रुपयांची खंडणी मागितल्याचा प्रकार माहे जानेवारी, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्रकरणी सायबर पोलीस ठाणे, पुणे येथे तक्रार दाखल करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने दोषीवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१७-०१-२०२३) :** (१) होय.

(२) होय.

(३) सदर प्रकरणी अज्ञात इसमाविरुध्द भारतीय दंड संहिता कलम ३८४, ५०७(२), ५११ सहकलम ६६(क) माहिती तंत्रज्ञान अधिनियम अन्वये पो.स्टे. विमानतळ, पुणे शहर येथे गु.र.क्र. ९/२०२२ दाखल करण्यात आला आहे. सदर गुन्ह्याचा तपास सुरु आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजा ब्राम्हणी (ता.कुही, जि.नागपूर) पोलीस स्टेशन उमरेड, मौजा भूगांव (ता.कामठी जि.नागपूर)पोलीस स्टेशन मौदा अंतर्गत सांस्कृतिक कार्यक्रमाचे नावावर मुलींचे अश्लिल नृत्य सार्वजनिकरित्या सादर करण्याचा झालेला गैरप्रकार

**(५) १३१६२ (३०-०३-२०२२) श्री.चंद्रशेखर बावनकुळे, श्री.विलास पोतनीस, श्री.सुनिल शिंदे :** सन्माननीय **उप मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजा ब्राम्हणी (ता.कुही) व मौजा भूगांव (ता.कामठी) (जि.नागपूर) येथे सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करुन तेथे मुलींचे अश्लिल नृत्य सार्वजनिकरित्या सादर करण्याचे गैरप्रकार घडल्याचे माहे जानेवारी २०२२ मध्ये वा दरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त ठिकाणच्या सांस्कृतिक कार्यक्रमाकरिता स्थानिक पोलीस प्रशासन, स्थानिक ग्रामपंचायत/ नगरपरिषद/ नगरपंचायत या प्रशासनामार्फत आवश्यक त्या परवानग्या घेण्यात आल्या होत्या काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने परवानगी देतांना योग्य ती खबरदारी न घेतल्यासंदर्भात स्थानिक प्रशासनावर तसेच गैरप्रकारास प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष पाठिंबा देणाऱ्या व्यक्तींवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४-१२-२०२२) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) मौजा ब्राम्हणी (ता.कुही) व मौजा भूगाव (ता.कामठी) जि.नागपूर येथे झालेल्या सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करण्यासाठी पोलीस विभाग तसेच इतर कोणत्याही विभागाच्या कार्यालयाकडून परवानगी घेण्यात आलेली नव्हती.

(३) उमरेड पोलीस स्टेशन येथे अप. क्र. ३३/२२ भा.दं.वि. कलम २९४, १८८, ११४, ३४ माहिती तंत्रज्ञान कायदा कलम ६७(अ), म.पो.का. कलम १३१(अ), ११०, ११२, ११७ अन्वये गुन्हा नोंद करण्यात आला असून, १३ आरोपीस अटक करण्यात आली आहे. सदर गुन्ह्यामध्ये दिनांक १९/०३/२०२२ रोजी मा.न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करण्यात आले असून, सदर गुन्हा सद्य:स्थितीत न्यायप्रविष्ट आहे.

मौदा पोलीस स्टेशन येथे अप. क्र. २९/२२ भा.दं.वि. कलम २९४, १८८, ११४, ३४, माहिती तंत्रज्ञान कायदा कलम ६७ (अ), म.पो.का. कलम १३१ (अ), ११०, ११२, ११७ अन्वये गुन्हा नोंद करण्यात आला असून, ७ आरोपीस अटक करण्यात आली असून, सद्य:स्थितीत गुन्हा तपासावर आहे. प्रस्तुत प्रकरणी संबंधित पोलीस अधिकारी व अंमलदार यांनी योग्य ती जबाबदारी न निभावल्यामुळे पोलीस

स्टेशन उमरेड ब्राम्हणी येथील एक पोलीस हवालदार व पोलीस स्टेशन, मौदा येथिल एक पोलीस हवालदार यांना तात्काळ निलंबित करण्यात येऊन त्यांनी कर्तव्यात केलेल्या निष्काळजीपणाबाबत तसेच दोन पोलीस निरीक्षक यांची वेतनवाढ थांबविण्याबाबत कारणे दाखवा नोटीस बजावली आहे. तसेच, अन्य दोन पोलीस कर्मचाऱ्यास कसुरीबाबत रुपये ५००/- प्रत्येकी आर्थिक दंडाची शिक्षा देण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील मोडकळीस आलेल्या शेकडो उपकरप्राप्त इमारतींच्या दुरुस्तीसाठी निधी उपलब्ध करून देण्याबाबत

**(६) १३५४५ (३०-०३-२०२२) श्री.सुनिल शिंदे, श्री.विलास पोतनीस : दिनांक ४ मार्च, २०२२ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ३ मधील प्रश्न क्रमांक ४१७६ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उप मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील शेकडो उपकरप्राप्त इमारती मोडकळीस आल्या असून त्यांच्या दुरुस्तीसाठी शासनाने रुपये ५०० कोटींची तरतूद करावी, अशी मागणी स्थानिक लोकप्रतिनिधी यांनी मा.मुख्यमंत्री आणि मा.गृहनिर्माण मंत्री महोदयांकडे दिनांक १४ फेब्रुवारी, २०२२ रोजी वा त्यासुमारास लेखी निवेदनाद्वारे केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने मुंबईतील मोडकळीस आलेल्या शेकडो उपकरप्राप्त इमारतींच्या दुरुस्तीसाठी आवश्यक निधी उपलब्ध करून देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२४-०१-२०२३) :** (१) मुंबई इमारत दुरुस्ती व पुर्नरचना मंडळाच्या अहवालानुसार, माहे मार्च, २०२२ मध्ये झालेल्या अर्थसंकल्पीय अधिवेशनामध्ये श्री.सुनिल शिंदे, मा.वि.प.स. यांनी महाराष्ट्र विधानपरिषद नियम ९२(२)(अ) सूचना क्र.२६६(७) अन्वये अर्धातास चर्चेच्या अनुषंगाने उपकरप्राप्त इमारतींच्या दुरुस्तीकरिता महापालिकेने रुपये ५०० कोटीची तरतुद करावी, अशा प्रकारची मागणी सर्व स्तरावरुन होत असल्याची बाब उपस्थित केली होती.
(२) मुंबई शहरातील मोडकळीस आलेल्या उपकरप्राप्त इमारतींच्या दुरुस्तीकरिता म्हाडा निधीतून सन २०२१-२०२२ करिता रुपये १०० कोटी इतकी रक्कम उपलब्ध करुन देण्याबाबत शासनाने दिनांक ०२ जून, २०२१ रोजीच्या पत्रान्वये म्हाडास निर्देश दिले आहेत. तसेच दुरुस्ती उपकराची व अंशदानाची रक्कम या विभागाच्या दिनांक १०/०३/२०२२ व दिनांक ३१/०३/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये अनुक्रमे रुपये ३८ कोटी व रुपये १९ कोटी असे एकूण रुपये ५७ कोटी इतकी रक्कम मुंबई इमारत दुरुस्ती व पुर्नरचना मंडळास उपलब्ध करुन देण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई-पुणे महामार्गावर "वाहतूक व्यवस्थापन यंत्रणा" बसविण्याबाबत

**(७) १३५४६ (३०-०३-२०२२) श्री.सुनिल शिंदे, श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई-पुणे महामार्गावर बेशिस्त वाहनचालकांना लगाम लावण्यासाठी तसेच वाहतूक नियंत्रण करुन अपघात रोखण्यासाठी "वाहतूक व्यवस्थापन यंत्रणा" बसविण्याचा निर्णय महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने' घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू यंत्रणेचे थोडक्यात स्वरुप काय आहे, त्यासाठी किती खर्च अपेक्षित आहे, सदरहू यंत्रणा बसविण्याची कामाची सद्य:स्थिती काय आहे आणि सदरहू यंत्रणा कार्यान्वित होण्यास किती कालावधी अपेक्षित आहे,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने मुंबई-पुणे महामार्गावर "वाहतूक व्यवस्थापन यंत्रणा" बसविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.रविंद्र चव्हाण (१८-०१-२०२३) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) सदर यंत्रणेद्वारे मुंबई पुणे द्रुतगती महामार्गावर वाहतूक नियमांचे उल्लंघन करणाऱ्या वाहनांना दंड करण्यासाठी द्रुतगती मार्गावर कॅमेरे बसविण्यात येणार आहेत. यंत्रणा बसविण्यासाठी व तद्नंतर यंत्रणेची देखभाल व दुरुस्तीसह (एकूण १० वर्ष कालावधी) करण्यासाठी अंदाजित खर्च रुपये ११५ कोटी इतका आहे. सद्य:स्थितीत काम प्रगतीत आहे. अंदाजे ९ महिन्यात यंत्रणा कार्यान्वित होईल.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील निरंतर शिक्षण विभाग बंद झाल्याबाबत

**(८) १३८०१ (२५-०८-२०२२) ॲड.निरंजन डावखरे, श्री.नागोराव गाणार, श्री.चंद्रशेखर बावनकुळे, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रवीण दटके, श्री.रमेशदादा पाटील, श्री.रमेश कराड, श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शिक्षण उपसंचालक व शिक्षणाधिकारी कार्यालयात अनेक जागा रिक्त असून सदरहू जागा निरंतर शिक्षण विभागाकडून भरण्यात येणार असल्याचे माहे एप्रिल, २०२२ च्या दुसऱ्या आठवड्यात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, निरंतर शिक्षण विभाग जिल्हास्तरावरील माध्यमिक शिक्षणाधिकारी कार्यालयाकडे वर्ग करण्यात आल्याने विभागातील 'अ' दर्जाचे १७ अधिकारी आणि गट 'ब' ते 'ड' गटातील ३३० इतर अधिकारी, कर्मचारी शिक्षण विभागाला मिळणार आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, यामुळे शिक्षण विभागाचे ४० कोटीहून अधिक रुपये आणि इतर भत्तेही वाचणार आहेत, तसेच निरंतर शिक्षण विभाग जिल्हास्तरावरील शिक्षणाधिकारी कार्यालयांकडे वर्ग करण्याचा निर्णय शालेय शिक्षण विभागाने घेतला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे, तसेच सदरहू निर्णयानुसार अधिकाऱ्यांची नियुक्ती केव्हापर्यंत होणार आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (०२-१२-२०२२) :** (१) हे खरे नाही.
(२) हे खरे नाही.
(३) अंशत: खरे आहे.

शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय दिनांक ०४/०४/२०२२ अन्वये शालेय शिक्षण विभागांतर्गत असलेले शिक्षणाधिकारी (निरंतर शिक्षण) कार्यालयाचे कामकाज संबंधित जिल्ह्याच्या शिक्षणाधिकारी (माध्यमिक शिक्षण) कार्यालयाकडे वर्ग करण्यात आले आहे.
(४) शासन निर्णय दिनांक २२/०६/२०२२ अन्वये शालेय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील अल्पसंख्यांक व प्रौढ शिक्षण संचालनालयाचे नामांतर शिक्षण संचालनालय (योजना) असे करण्यात आले असून, प्राथमिक शिक्षण संचालनालय तसेच माध्यमिक शिक्षण संचालनालयाकडील योजना शिक्षण संचालनालय (योजना) कार्यालयाकडे वर्ग करण्यात आल्या आहेत. जिल्हास्तरावर शिक्षणाधिकारी (योजना) कार्यालयाची निर्मिती करण्यात आली असून, सदर कार्यालयातील गट-अ व गट-ब पदावर तात्पुरत्या स्वरुपात पदस्थापना देण्याबाबत आयुक्त (शिक्षण) यांना प्राधिकृत करण्यात आले असून, गट-क व गट-ड संवर्गाच्या पदांवर तात्पुरती नियुक्ती अथवा अतिरिक्त कार्यभार देण्याचे अधिकार संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालकांना देण्यात आले आहेत.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शहापूर व मुरबाड तालुक्यात काळु व शाई धरण प्रकल्प बांधण्याबाबत

**(९) १३८२५ (२५-०८-२०२२) ॲड.निरंजन डावखरे, श्री.प्रविण दरेकर, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **उप मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ठाणे, कल्याण-डोंबिवली, उल्हासनगर, भिवंडी, अंबरनाथ व बदलापूर शहरात वाढत्या शहरीकरणाबरोबरच तीव्र पाणी टंचाई निर्माण झाली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्य शासनाने दहा वर्षापूर्वी शहापूर व मुरबाड तालुक्यात काळु व शाई धरण प्रकल्पाचे काम करण्याचे ठरविले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सद्य:स्थितीत दोन्ही धरणे बांधण्यासंदर्भातील स्थिती काय आहे,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने शहापूर व मुरबाड तालुक्यात काळु व शाई धरण प्रकल्प बांधण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१७-०१-२०२३) :** (१) हे खरे आहे.
(२) होय.

राज्य शासनाने सन २००९ मध्ये शहापूर व मुरबाड तालुक्यात काळु व शाई धरण प्रकल्पाचे काम करण्याचे ठरविले होते.

(३) १. काळू नदी प्रकल्प :- सद्य:स्थितीत सदर प्रकल्पामुळे बुडीत होणारी खाजगी जमीन भूसंपादन करण्यासाठी प्रस्ताव तयार करण्यात आले असून जिल्हाधिकारी, ठाणे यांचेमार्फत भूसंपादनाची कार्यवाही प्रगतीपथावर असून धरणाचे काम बंद आहे.

या प्रकल्पासाठी एकूण रुपये ९९९.३२८ हेक्टर वनजमीन संपादनाची आवश्यकता असून नक्त वर्तमान मुल्यापोटी रुपये ३९६.४४ कोटी इतक्या रक्कमेची आवश्यकता आहे.

२. शाई नदी प्रकल्प :- सद्य:स्थितीत भूसंपादन व पुनर्वसन कार्यवाही प्रगतीपथावर असून धरणाचे काम सुरु नाही.

या प्रकल्पासाठी एकूण रुपये ४९४.१४६ हेक्टर वनजमीन संपादनाची आवश्यकता असून नक्त वर्तमान मुल्यापोटी रुपये १७९.१४ कोटी इतक्या रकमेची आवश्यकता आहे.

यासंदर्भात एकूण रुपये ५७५.५८ कोटी इतकी नक्त वर्तमान मूल्य (NPV) रक्कम मुंबई महानगर क्षेत्र विकास प्राधिकरण (MMRDA) यांच्याकडून उपलब्ध होताच वन विभागाकडे वर्ग करण्यात येईल.

(४) मुंबई महानगर क्षेत्र विकास प्राधिकरण (MMRDA) यांच्याकडून निधीची उपलब्धता होणेबाबत पाठपुरावा करण्यात येत आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## तत्कालिन प्रभारी शिक्षणाधिकारी (माध्य) जि.प. चंद्रपूर यांचेवर फौजदारी गुन्हा दाखल करण्याबाबत

**(१०) १३९७८ (२५-०८-२०२२) श्री.चंद्रशेखर बावनकुळे, श्री.नागोराव गाणार, श्री.प्रवीण दटके, ॲड.निरंजन डावखरे, श्री.रमेशदादा पाटील, श्री.गोपिचंद पडळकर, श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) तत्कालिन प्रभारी शिक्षणाधिकारी (माध्य) जि.प. चंद्रपूर, श्री.आर. डी. पाटील, माध्यमिक प्रभू रामचंद्र विद्यालय नांदा, ता.कोरपना, संस्था सचिव/अध्यक्ष तुकडोजी महाराज बहुउद्देशीय शिक्षण संस्था नांदा, चंद्रपूर, सचिव आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, राजुरा यांचेवर फौजदारी गुन्हा दाखल करण्याबाबत विभागीय शिक्षण उपसंचालक नागपूर विभाग, नागपूर यांना दिनांक २५/०२/२०२१ रोजी पत्र पाठवून प्रकरणाची चौकशी करण्याबाबत व दोषींविरुध्द गुन्हे दाखल करण्याबाबत निवेदन दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सुमारे १ वर्षानंतर शिक्षण उपसंचालक यांनी शिक्षणाधिकारी यांना दिनांक ४ मार्च, २०२२ रोजीच्या पत्रानुसार आदेश दिले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरण गैरकारभाराशी संबंधित असल्याने प्रकरणाचे गांभीर्य लक्षात न घेता अत्यंत संथगतीने कार्यवाही होत असल्याने संशयाचे वातावरण निर्माण झाले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी विलंबाने कार्यवाही करण्याची कारणे काय आहेत, तसेच यावर केव्हापर्यंत कार्यवाही करण्यात येईल ?

**श्री.दिपक केसरकर (३०-११-२०२२) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२) व (३) हे खरे नाही. सदर निवेदन शिक्षण उपसंचालक नागपूर विभाग, नागपूर यांच्या कार्यालयास दिनांक २५/०२/२०२२ रोजी प्राप्त झाले असून त्यावर शिक्षणाधिकारी (माध्य.), जि.प.चंद्रपूर यांना दिनांक ०४/०३/२०२२ च्या पत्रान्वये चौकशी करुन अहवाल सादर करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत. त्यानुषंगाने त्रिसदस्यीय समितीकडून प्राप्त अहवालाच्या अनुषंगाने शिक्षण उपसंचालक नागपूर विभाग, नागपूर यांच्या स्तरावर पुढील कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील जिल्हा परिषद शाळेतील शिक्षकांच्या वेतनातून कपात होणाऱ्या रकमेचा हिशेब देण्याबाबत

**(११) १४०९५ (२५-०८-२०२२) श्री.रामदास आंबटकर, श्री.नागोराव गाणार, श्री.चंद्रशेखर बावनकुळे, श्री.प्रवीण दटके :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील जिल्हा परिषद शाळेतील दिनांक १ नोव्हेंबर, २००५ नंतर नियुक्त झालेल्या शिक्षकांच्या वेतनातून १० टक्के कपात (डीसीपीएस) परिभाषित अंशदायी निवृत्तीवेतन योजनेंतर्गत कपात होणाऱ्या रक्कमेचा हिशेब संबधीत शिक्षकांना प्राप्त होत नसल्याचे दिनांक १६ मे, २०२२ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार शिक्षकांना न्याय मिळण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (०९-१२-२०२२) :** (१) व (२) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेतंर्गत नवीन लेखाशीर्ष उघडणेबाबत दिनांक १८/०२/२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये आणि परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंशदानाच्या रकमा प्रदान करण्याबाबतची कार्यपध्दती दिनांक २०/१२/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेली आहे. डिसीपीएस खात्यावरील रक्कमेचा हिशोब संबंधितांना देण्याबाबत संचालक स्तरावर वेळोवेळी आढावा घेण्यात येत आहे. सदर हिशोब लवकरात लवकर पूर्ण करुन होणेबाबत संचालक स्तरावरुन सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. यांना कळविण्यात आले आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सोलापूर जिल्ह्यातील शाळा न्यायाधिकरणाचे कार्यालय बंद केल्याबाबत

**(१२) १४२८२ (२५-०८-२०२२) श्री.रणजितसिंह मोहिते-पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोलापूर न्यायाधिकरण कार्यालयात काम कमी असल्याचे कारण दाखवत शासनाने दिनांक २० मे, २०२२ रोजी वा त्यासुमारास सोलापूर शाळा न्यायाधीकरण कार्यालय बंद करुन सोलापूर जिल्हा हा पुणे न्यायाधीकरणास जोडण्याचा निर्णय घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सोलापूर न्यायाधीकरणांतर्गत सुमारे २००० खाजगी शैक्षणिक संस्था असून दरमहा १५ दावे दाखल होत असून निकालाच्या प्रतिक्षेत सुमारे १५० दावे आहेत, तसेच अहमदनगर व उस्मानाबाद या जिल्ह्याचे कामकाजही सोलापूर न्यायाधीकरणांतर्गत चालते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सोलापूर न्यायाधीकरणाअंतर्गत इतर दोन जिल्हे व प्रलंबित कामे असताना सदरहू कार्यालय बंद करण्याची करणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (३०-११-२०२२) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) हे खरे आहे.
(३) प्रत्येक शैक्षणिक विभागासाठी एकच शाळा न्यायाधिकरण असावे, या उद्देशाने सर्व शाळा न्यायाधिकरणांची पुनर्रचना करून दिनांक २०/०५/२०२२ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला होता. तथापि, सदर शासन निर्णय मागे घेण्यात आला असून, दिनांक २९/०६/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सोलापूर येथे शाळा न्यायाधिकरण पुन: सुरु करण्यात आले आहे.

---

## मुंबईत विदर्भ साहित्य भवन उभारण्याबाबत

**(१३) १४४६४ (२५-०८-२०२२) श्री.अभिजित वंजारी :** सन्माननीय **मराठी भाषा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर मुंबईत विदर्भ साहित्य भवन उभारण्याचे शासनाच्या विचाराधीन असूनही याबाबत कोणतीही कार्यवाही करण्यात आली नसल्याचे माहे एप्रिल, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने यासंदर्भात शासनाने माहिती व निर्णय घेवून मुंबईत विदर्भ साहित्य भवन उभारण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (११-०१-२०२३) :** (१) नाही.

मराठी भाषा विभागातील भाषाविषयक कार्यासनांतील अभिलेखांची तपासणी केली असता तसेच अधिनस्त कार्यालयांकडे अहवाल मागविला असता मुंबईत विदर्भ साहित्य भवन उभारण्याबाबत कोणत्याही स्वरुपाचा प्रस्ताव मराठी भाषा विभागामध्ये अद्याप प्राप्त झाल्याचे आढळून आले नाही.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## विदर्भ, मराठवाडा आणि उर्वरित महाराष्ट्राच्या वैधानिक विकास मंडळांना मुदतवाढ देण्याबाबत

**(१४) १४९५५ (२५-०८-२०२२) श्री.अभिजित वंजारी : तारांकित प्रश्न क्रमांक १३३७८ ला दिनांक २५ मार्च, २०२२ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उप मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील प्रादेशिक विकासाचे संतुलन कायम ठेवण्याच्या उद्देशाने दिनांक ३० एप्रिल, १९९४ रोजी विदर्भ, मराठवाडा व उर्वरित महाराष्ट्राच्या मागास भागासाठी या मंडळाची स्थापना केली असून महामंडळाचा कार्यकाळ दिनांक ३० एप्रिल, २०२० रोजी समाप्त झाला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या तीनही विकास मंडळांचे पुनर्गठन करण्याबाबतच्या विचाराधीन असलेल्या प्रस्तावावर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१२-१२-२०२२) :** (१) होय.
(२) व (३) मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक २७ सप्टेंबर, २०२२ रोजीच्या बैठकीत विदर्भ विकास मंडळ, नागपूर, मराठवाडा विकास मंडळ, औरंगाबाद व उर्वरित महाराष्ट्र विकास मंडळ, मुंबई ही तीनही वैधानिक विकास मंडळे पुनर्गठीत करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

---

## विदर्भातील सहा जिल्हे आदिवासी विकास योजनेपासून वंचित असल्याबाबत

**(१५) १५३३० (२८-१२-२०२२) श्री.अमोल मिटकरी, श्री.शशिकांत शिंदे, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) विदर्भातील गोंदिया, भंडारा, नागपूर, वर्धा, अकोला व बुलढाणा या सहा जिल्ह्यात देशात १९७१ मध्ये झालेल्या जनगणनेत अनुसूचित क्षेत्रांची पुनर्रचना करण्यात आली नसल्याने गेल्या ३७ वर्षानंतरही शासन प्रशासनाने याबाबत दुरुस्ती व सुधारणा केली नसल्याने मा.राज्यपाल महोदयांना पत्राद्वारे पेसा क्षेत्राची पुनर्रचना करावी अशी मागणी एका संस्थेने केली असल्याचे माहे ऑक्टोबर, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यात १९८५ मध्ये अनुसूचित क्षेत्रातील गावे घोषित करण्यात आली ती अधिसूचना सन १९७१ च्या जनगणनेच्या माहितीवर आधारित होती, हेही खरे आहे काय,
(३) असल्यास, विदर्भातील आदिवासी बहुल गोंदिया, भंडारा, नागपूर, वर्धा, अकोला, बुलढाणा जिल्ह्यातील तालुक्यात आदिवासी लोकसंख्या मोठ्या प्रमाणात असूनही ती नसल्याचे दाखविण्यात आले असल्याने विदर्भातील आदिवासींवर अन्याय होत आहे, हेही खरे आहे काय,
(४) असल्यास, केंद्रातील जनजाती कार्य मंत्रालयाकडून दिनांक २६ मे, २०१५ रोजी वा त्या सुमारास राज्यातील अनुसूचित क्षेत्राच्या पुनर्रचनेच्या कामास चालना देण्याच्या सूचना आहेत त्यानुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. विजयकुमार गावीत (२५-०१-२०२३) :** (१) महाराष्ट्र राज्याच्या अनूसूचित क्षेत्राची पुनर्रचना करण्यासंदर्भात मा.राज्यपाल महोदयांना संस्थेने दिनांक ०२/१०/२०२२ रोजीच्या पत्रान्वये निवेदन दिलेले आहे.

(२), (३) व (४) मा.राष्ट्रपती महोदय यांच्याद्वारा महाराष्ट्र राज्याच्या अनुसूचित क्षेत्राबाबत दिनांक २ डिसेंबर, १९८५ रोजी काढण्यात आलेली अधिसूचना सन १९७१ च्या जनगणनेवर आधारित आहे.

सदर अधिसूचनेमध्ये गोंदिया, भंडारा, नागपूर, वर्धा, अकोला व बुलढाणा या जिल्ह्यांचा समावेश नाही. परंतु सदरील जिल्ह्यांमध्ये अतिरिक्त,आदिवासी उपयोजना क्षेत्र, माडा व मिनिमाडा हे क्षेत्र समाविष्ट असून या क्षेत्राच्या अनुषंगाने अनुज्ञेय असणारे लाभ या जिल्ह्यांना मिळत आहेत.

दिनांक २ डिसेंबर, १९८५ रोजीची अधिसूचना काढून ३७ वर्षाचा कालावधी झालेला आहे.त्यामुळे सद्य:स्थितीत महाराष्ट्र राज्याच्या अनुसूचित क्षेत्राची पुनर्रचना करणे आवश्यक आहे. अनुसूचित क्षेत्रात गावांचा समावेश करण्यासाठी केंद्र शासनाने दिनांक २६ मे,२०१५ च्या पत्रान्वये काही निकष निश्चित केले आहेत. महाराष्ट्र राज्याच्या अनुसूचित क्षेत्राच्या पुनर्रचनेच्या अनुषंगाने दिनांक २३/११/२०२२ रोजी मा.मंत्री, आदिवासी विकास यांच्याकडे बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकितील चर्चेनुसार व केंद्र शासनाच्या निकषांनुसार आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्यामार्फत राज्याच्या अनुसूचित क्षेत्राच्या पुनर्रचनेचा प्रस्ताव तयार करण्याची कार्यवाही चालू आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## परभणी जिल्ह्यातील तरूणांना मुद्रा लोन वाटपातील थकबाकी मिळणेबाबत

**(१६) १५९७४ (२८-१२-२०२२) श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, श्री.शशिकांत शिंदे :** सन्माननीय **उप मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) परभणी जिल्ह्यामध्ये मागील सात वर्षात पावणे दोन लाख बेरोजगार तरूणांना कर्ज वाटप करण्यात आले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर कर्ज वाटप सुशिक्षित बेरोजगारांऐवजी हित संबंधातील व्यक्तींना करण्यात येत असल्याबाबतची तक्रार परभणी येथील सामाजिक कार्यकर्त्यांनी जिल्हाधिकारी, परभणी यांच्याकडे सन २०२२ मध्ये वा त्यादरम्यान नोंदविली आहे, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, बँक अधिकारी व हित संबंधातील सुशिक्षित बेरोजगार यांच्यात वाटप झालेल्या मुद्रालोण प्रकरणी मोठ्या प्रमाणावर थकबाकी राहिल्याने त्याच्या वसुलीची जबाबदारी निश्चित करण्यात आली आहे काय,

(४) नसल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने मुद्रालोण थकबाकी वसुली करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२४-०१-२०२३) :** (१) अंशत: खरे आहे. परभणी जिल्ह्यात मागील सात वर्षात मुद्रा कर्ज अंतर्गत २ लाख ६५ हजार ८८५ बेरोजगारांना कर्ज देण्यात आले.

(२) हे खरे नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मरकटवाडी (ता.मोखाडा, जि.पालघर) या आदिवासी दुर्गम भागातील बालकांना पोषण आहार उपलब्ध करून देणाऱ्या अंगणवाडी सेविकांना प्रोत्साहन भत्ता देण्याबाबत

**(१७) १६०२३ (२८-१२-२०२२) श्री.राजेश राठोड, डॉ.प्रज्ञा सातव :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मरकटवाडी(ता.मोखाडा, जि.पालघर) या आदिवासी दुर्गम भागातील बालकांना अंगणवाडी सेविका श्रीमती जयश्री ठोंबरे या प्रतिदिन सुमारे तीन कि.मी. अंतर चालुन जाऊन गत २० वर्षापासून पोषण आहार पुरवित आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यामुळे शासनाने या संदर्भात माहिती घेवून कुपोषण मुक्तीसाठी झटणाऱ्या सदर अंगणवाडी सेविकेला खास बाब म्हणून प्रोत्साहन भत्ता देण्याबाबत कोणती कार्यवाही केली आहे वा येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.मंगलप्रभात लोढा (१८-०१-२०२३) :** (१) हे खरे आहे.

(२) एकात्मिक बालविकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत सेवा योजना असून या योजनेंतर्गत दुर्गम भागात काम करणाऱ्या अंगणवाडी सेविकांना विशेष प्रोत्साहन भत्ता देण्याबाबत कोणत्याही प्रकारची तरतूद नाही. अंगणवाडी सेविकेला रुपये ८३२५/- व अंगणवाडी मदतनिस यांना रुपये ४४२५/- तर मिनी अंगणवाडी सेविका यांना रुपये ५९७५/- एवढे दरमहा नियमीत मानधन देण्यात येते. याशिवाय अंगणवाडीतील उत्कृष्ट कामकाजासाठी अंगणवाडी सेविकेस रुपये ५००/- आणि अंगणवाडी मदतनिस यांना रुपये २००/- प्रोत्साहन भत्ता देण्यात येतो. तसेच अंगणवाडी सेविका, अंगणवाडी मदतनिस व मिनी अंगणवाडी सेविका यांना रुपये २०००/- भाऊबिज देण्यात येते.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

## रायगड जिल्ह्यातील मुरुड तालुक्यातील अंगणवाडी सेविकांनी पदाचा सामूहिक राजीनामा सादर केला असल्याबाबत

**(१८) १६४०० (२८-१२-२०२२) श्री.नागोराव गाणार, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रसाद लाड :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रायगड जिल्ह्यातील मुरुड तालुक्यातील १७ अंगणवाडी सेविकांनी नायब तहसिलदाराच्या त्रासाला कंटाळून आपल्या पदाचा सामूहिक राजीनामा सादर केला असल्याची बाब माहे ऑक्टोबर, २०२२ च्या दुसऱ्या सप्ताहात वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या अनुषंगाने अंगणवाडी सेविकांनी जिल्हाधिकारी, रायगड यांना निवेदन दिले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर १७ अंगणवाडी सेविकांना सामुहिक राजीनामा द्यावा लागू नये, याकरिता प्रशासनिक समन्वय साधण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही अथवा उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.मंगलप्रभात लोढा (१७-०१-२०२३) :** (१) रायगड जिल्ह्यातील मुरुड तालुक्यातील १७ अंगणवाडी सेविकांनी अंगणवाडी सेविका या पदाचा राजीनामा दिलेला नसून त्यांनी BLO (बूथ स्तर अधिकारी) पदाचा राजीनामा जिल्हाधिकारी कार्यालय, रायगड येथे सादर केला होता.
(२) हे खरे आहे.
(३) प्रस्तुत प्रकरणी या अंगणवाडी सेविकांसमवेत तहसिलदार, मुरुड कार्यालयात चर्चा करून त्यांच्या तक्रारीचे समाधान केलेले असून त्यामुळे संबंधित सेविकांनी स्वखुशीने लेखी स्वरूपात तक्रार मागे घेतली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महाराष्ट्र राज्य उच्चश्रेणी व सेवानिवृत्त प्राथमिक शिक्षण महासभा या संघटनेने त्यांच्या समस्या सोडविण्याबाबत केलेली मागणी

**(१९) ३०५१० (१६-०८-२०१२) श्री.नागोराव गाणार, डॉ.रणजित पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महाराष्ट्र राज्य उच्चश्रेणी मुख्याध्यापक व सेवानिवृत्त प्राथमिक शिक्षण महासभा या संघटनेचे नागपूर येथे दिनांक ३ व ४ मार्च, २०१२ रोजी अधिवेशन पार पडले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, ह्या संघटनेने त्यांच्या अधिवेशनात मांडलेल्या समस्या सोडविण्याची शासनास पत्र पाठवून मागणी केली, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, संघटनेने केलेल्या मागण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत,
(५) तसेच त्यांच्या मागण्याबाबत शासनाची भूमिका काय आहे ?

**श्री.दिपक केसरकर (३०-१२-२०२२) :** (१) व (२) निवेदन प्राप्त झाल्याचे आढळून आले नाही.
(३), (४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आरटीई २००९ नुसार इयत्ता ६ वी ते ८ वी करिता पदवीधर प्रशिक्षित शिक्षकांची पदस्थापना करण्याबाबत

**(२०) ४४३२७ (०५-१२-२०१८) डॉ.(श्रीमती) मनिषा कायंदे : तारांकित प्रश्न क्रमांक ३८८७६ ला दिनांक २३ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आरटीई, २००९ नुसार इयत्ता ६ वी ते ८ वी करिता पदवीधर प्रशिक्षित शिक्षकांची पदस्थापना करण्याचा निर्णय शासनाने घेतला असून तद्नुसार इयत्ता ६ ते ८ पर्यंत वर्ग असणाऱ्या शाळांकरिता पदवीधर प्रशिक्षित शिक्षकांची पदस्थापना झाली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर शिक्षकांना वेतनश्रेणी लागू केली आहे काय, सदर वेतनश्रेणी केव्हापासून लागू करण्यात येणार आहे,
(३) असल्यास, विज्ञान व गणित विषयांच्या अद्यापनाकरिता योग्य अर्हता धारकांच्या नियुक्त्या करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे काय ?

**श्री.दिपक केसरकर (०७-१२-२०२२) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) बालकाचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ अन्वये उच्च प्राथमिक स्तरावर विज्ञान, भाषा व सामाजिक शास्त्रे या विषय संवर्गातील प्रत्येकी किमान एक शिक्षक नियुक्त करणे आवश्यक असल्याने, शासन परिपत्रक दिनांक १३/१०/२०१६ अन्वये इयत्ता ६ वी ते ८ वी या वर्गांना शिकविणाऱ्या शिक्षकांपैकी १/३ शिक्षकांना सेवाज्येष्ठतेप्रमाणे पदवीधर वेतनश्रेणी देण्याची तरतूद आहे.
सद्य:स्थितीत शासन निर्णय दिनांक २७/०६/२०२२ अन्वये उच्च प्राथमिक इयत्ता ६ वी ते ८ वी या वर्गांकरिता नियुक्त पदवीधर शिक्षकांना पदवीधर वेतनश्रेणी लागू करण्याच्या अनुषंगाने अभ्यास समिती गठीत करण्यात आली आहे.
(३) राज्यातील शिक्षकांकरिता विषयनिहाय शैक्षणिक व व्यावसायिक अर्हता सुधारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**राजेन्द्र भागवत**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.